चा पलंग कधीं विटाळिला नाहीं. ती जांअ-
वळ आपल्या गुह्य गोष्टी सांगत असे, अ-
शा तीन बायकांनीं तिजवर या पेक्षां वि-
शेष गुन्हा लागु केला. त्या वेळचे क्रूर पा-
र्लमेंटास इतकी बातमी समजतांच त्या
सभेनें राणीवर गुन्हा लागू केला; आणि
राजास विनंती केली कीं, तिला ठार मारा-
वें; तिचे दुराचरणा विषयीं जी राच्फो-
र्ड म्हणून बायको साथी होती तिचें आ-
णि तिची विधवा आजी नार्फोकाची ड-
चेस तिचा बाप, आई, आणि दुसरे बाय-
का पुरुष मिळून नऊ, यांचें ही तेंच शास-
न करावें. कारण त्यांचा मसलतीनें राणी-
नें दुराचरणें केलीं होतीं. अशी अर्जी पा-
हून राजास फार संतोष वाटला, आणि
त्याणें त्या कर्मास संमति दिली. मग त्या
सर्वांचा वध केला. दुसरें असें केलें कीं,
पुढें राजा एकाद्ये बायकोशीं लग्न करीत

असला

असला, आणि तिचें दुराचरण कोणास ठाऊक असलें तर तें त्याणें येऊन जाहीर करावें; नाहीं केल्यास तो सरकारचा गुन्हेगार; आणि रवीं असा कायदा केला कीं, एकादी बायको दुराचरणी असोन ती राजाजवळ कबूल झाली नाहीं, आणि राजानें ती कुमारी म्हणून तिशीं लग्न केलें, तर ती सरकारची गुन्हेगार. हा विपरीत आणि निष्ठुर कायदा पाहून लोक थट्टा करूं लागले आणि असें बोलूं लागले कीं, आतां पुढें राजानें विधवेशीं मात्र लग्न करावें, म्हणजे निर्दोष लग्न होईल. त्या वेळेस फार चमत्कारिक गोष्ट ही कीं, अनेकपुरुषांची संमति जेव्हां पाहिजे तेव्हां मिळत असे. हे सर्व कायदे झाल्यावर, किल्ल्यांतील बुरुजावर राणीचा शिरछेद केला आणि लेडी राचफर्डेचा ही वध केला. तिणें पूर्वीं फार रक्त पाडि-

लें होतें, ह्मणून तीवर कोणी विशेष दया केली नाहीं.

ही बायको मेल्यानंतर सुमारें एक वर्षानें त्याणें शेवटची साहावी बायको केली. तिचें नाव क्याथेरीन पार. लोक ह्मणत आणि वास्तवीकच ती विधवा होती. तिचा पूर्वींचा नवरा लार्ड लातिमर ह्मणोन होता. ती बायको फार सदाचरणीं आणि चतुर होती. तिचे वयास पहिली पंचविशी होऊन गेली होती. परंतु तिणें त्या दुष्ट राजाचें मन मोठ्या चतुरपणानें राखिलें. तरी राजाचे प्रजांविषयीं क्रूरपणांत कांहीं अंतर पडलें नाहीं. कांहीं दिवस पर्यंत त्याचे पायांस सूज आली होती, त्याचे पोटांत विकृति होती, आणि दुसरीं दुखणीं, यामुळें तो असा त्रासदायक झाला कीं, त्याचे सेवक त्याजवळ मोटे भयानें जात. म्र-

गजे त्याचे मताशीं विरुद्ध होते, त्यांस क्षमा द्यावी ही आशा कोठून ?

पुढें त्याची शरीर प्रकृति जरी उत्तरोत्तर क्षीण होऊं चालिली, तरी त्याचे दुष्कर्मास खळ पडेना. इतकें मात्र झालें कीं तो सर्वांच्या सारिखा द्वेष करूं लागला. एकादे वेळेस प्रातेस्तंट आणि एकादे वेळेस क्याथोलिक या उभयतांस तो शासन करी. त्या दुष्ट राजापासून शेवटीं निरर्थक क्लेश पावले असे दोघे. नार्फोकाचा ड्यूक, आणि त्याचा मुलगा सरेचा अर्ल. ड्युक राजाची मोठ्या विश्वासूपणानें चाकरी केलेला असा गृहस्थ होता त्याचा मुलगा लहान असून सर्व गुणांत त्यापेक्षें अधिक, शूर, दरबारी, तसाच विद्वान्; त्या काळीं ज्या शौर्यकळा विदित होत्या त्या सर्वां मध्यें त्या सारिखा कोणीच नव्हता तो आपले आचरणानें कळा कौ-

शल्यें

शाल्वें वृद्धिंगत करीत होता. या सर्व गु-
णांपेक्षां विशेष हाकीं, त्याणें नाना प्रकार
चे पद्यरूप ग्रंथ करून इंग्रेजी भाषा किंचि-
त्शी सुरूपतेस आणिली होती.

इतकेही गुणें करून, त्याचें हेनरी
राजापासून संरक्षण झालें नाहीं. तें वर्त
मान असें. बोलोन प्रांतांचे मामलतीव-
रून त्यास काढिलें म्हणून तो राजाचे मं-
त्र्यांस कांहीं अपशब्द बोलिला, आणि
क्याथेरीन हवार्ड म्हणून जी पूर्वीं रा-
णी सांगीतली ती व्यभिचारी निघाली,
या दोन कारणामुळें तिचा शिरछेद केला.
म्हणून त्या सर्व कुटुंबावर राजाची गैरम-
र्जी झाली. नंतर त्या उभयतां बाप लेंकांस
धरावें म्हणून आंतून सरकारचा हुकुम
झाला. मग त्या दोयांस धरून एके दिव-
शींच किल्यावर टाकिलें. सरे प्रतिनि-
धींतला सभासद होता, म्हणून त्याची चौ-

कशी

कशी व्हायास उशीर लागला नाहीं. त्या-स शायदी पाहिजेत तर विश्वासघात क-रणारे आणि एकारक्ताचे असून वाल-टास येऊन गुह्यगोष्टी सांगणारे दुष्ट बहु-त होते; रिचमंडाची विधवा डचेस त्या-ची प्रत्यक्ष बहीण, तिचें ही नाव त्यावर आरोप ठेवणारांत होतें; आणि त्याचा प-रम मित्र, सौथवेल म्हणून होता तोही त्याणें राजाजवळ लबाडी केली. असा पुरा वा करायास सिद्ध झाला. त्यावरून अ-सें वाटतें कीं, त्या भयंकर समयीं सारे रा-ज्यांत कोठेंच विश्वास आणि थोरपणा म्ह-णून राहिला नव्हता.

हा अन्याय आपले पासून झाला नाहीं असें सरेनें म्हटलें; आणि प्रतिज्ञा केली, कीं मजवर जो अपराध ठेवितो, तो आणि मी पैजेनें युद्ध करूं. तसें त्यास करूं दिलें नाहीं, आणि असें स्थापिलें

कीं

कीं, त्याणें आपले वंशीय वस्त्रावर एड्व-
र्ड दिकन्फेसर राजाचें चिन्ह काढून रा-
ज्याविषयीं संधान आरंभिलें आहे. या-
वर त्याच्यानें जबाब करवेना, आणि जबा-
ब करायाचें कांहीं प्रयोजनही नव्हतें, का-
रण पार्लमेंट आणि जुरी तेव्हां राजाचे
मर्जी प्रमाणें वर्तत असत. तो गृहस्थ
आपले वरचा आरोप जाया करितां फार
शाहाणपणानें बोलिला, परंतु त्यास स-
रकारचा गुन्हेगार ठरवून किल्याचे घां-
टावर त्याचा शिरछेद केला. त्या काळीं
त्याचा बाप ड्युक राजास नम्रतेचीं पत्रें
पाठवून क्षमा व्हायाच्या प्रयत्न करीत
असे, परंतु राक्षसाचे हृदयास द्रव को-
ठून येणार ? जानुआरी महिन्याचे
इ॰ १५४६ चवदावे दिवशीं पार्लमेंटाची सभा
झाली, त्या वेळीं कांहीं विचार न करितां
प्रथमच नार्फोकावर सरकार गुन्हेगा-

रीचें

रीचें पत्र केलें; कारण सभासदांनीं त्याची चौकशी केली असती तर, त्यावर अन्याय ठरताच असें प्रमाण नव्हतें. मग मृत्यूचें शासन ठरविलें, आणि तें काम किल्ल्याचे लेफटिनेंटास सांगीतलें. ड्युकानें मरणाची सर्व तयारी केली. दुसरे दिवशीं सकाळीं त्याची समाप्ति व्हायाची इतक्यांत राज्यामध्यें एक त्यापेक्षें मोठें वर्तमान घडलें, आणि त्याचा शिरछेद राहिला.

तें असें. कांहीं दिवस अगोदर राजाचा अंतकाळ जवळ आला, असें चिन्ह दिसत होतें; आणि जवळ जे होते त्या सर्वांचा निश्चय झाला कीं, तो आतां फार दिवस वांचत नाहीं. त्याचे पायांत कांहीं दुःख होतें तें उत्तरोत्तर वाढत चाललें; आणि त्याचें दोंद फारच मोठें सुटलें होतें म्हणून त्याच्यानें जाग्यावरून हालवेना. या

मुळें

मुळें जसा एकादा सिंहपाशांत सांपडतो
तसा तो झाला. मरायाच्या पूर्वीं सुमारें चा-
रवर्षें तो अशा अवस्थेंत होता; तो असा
कीं, सर्वांस त्रासक आणि आपणास दुः-
खदायक; त्याचे दरबारी लोकांत परस्पर
मारायाचा उद्योग चालिला होता, म्हणून
त्यास मारायाचा उद्योग कोणी करीना. या
रीतीनें त्यास कोणी मृत्यु जवळ आला म्ह-
णून नसांगतां तो तसाच पडून दुःख पावत
होता; कारण त्याचा मृत्यूचें भविष्य केलें
म्हणून बहुत लोकांचा त्याणें शिरच्छेद केला
होता. शेवटीं **सर आंथनिडेनी** नामें पु-
रुष होता त्याणें धीर करून त्याचे जवळ
जाऊन सांगीतलें कीं, तुम्हीं आतां बहुत दि-
वस वांचत नाहीं. हें वर्तमान राजानें उदासी-
नपणें करून श्रवण केलें; हा त्या वेळेस
मोठा चमत्कार झाला. त्यास तेव्हां जें दुः-
ख आणि पश्चात्ताप झाला तो सांगतां ये-

त नाहीं. त्याणें ह्मटलें कीं, क्रामरास माझे जवळ घेऊन या; परंतु तो यायाचे पूर्वींच त्यांची वाचा बंद झाली. क्रामरानें त्यास सूचना केली कीं, आपण खिस्ताचे धर्मांत मरतां याचें आह्मास कांहीं चिन्ह दाखवावें. तेव्हां त्याणें क्रामराचा हात आपले हातानें घट्ट धरून प्राण सोडिला. त्याणें सततीस वर्षें नऊ महिने राज्य केलें, आणि त्याचे वयास तेव्हां छपन्नावें वर्ष होतें. कितिएक राजे शत्रूनीं उपद्रव करून त्रास आणिला ह्मणजे दुष्टस्वभाव धरितात; कितिएक लुच्चांचे बुद्धीस लागोन; कितिएक अभिमानास पडून; परंतु हेनरी राजा मुळापासूनच दुरात्मा, राज्य कामांत दुष्ट, धर्मांत क्रूर, आणि कुटुंबांत घातुक असा होऊन गेला.

---

# प्रकरण २४

## षष्ठ एडुर्ड राजाची कथा

### सन १५४६ पासून १५५३ पर्यंत



राजा हेनरी मृत्यु पावल्यावर, त्याचा पुत्र नऊ वर्षांचा होता तो राज्य करूं लागला. हेनरीनें मृत्युपत्रांत लिहून ठेविलें होतें कीं, तो अठरा वर्षांचा झाला म्हणजे त्याणें स्वेच्छेनें राज्य करावें; आणि तोंपर्यंत आपले मृत्युपत्राप्रमाणें सर्व बंदोबस्त चालविणारे आसामी सोळा नेमिले होते; त्यांत मुख्य, संरक्षक सामर्सेटाचा ड्युक, असें लिहिलें होतें.

तो संरक्षक ड्युक धर्मांतर व्यवस्था दृढ व्हायाविषयीं क्रामराचे मसलतीनें यत्न कडुन करीत असे. तो क्रामर

विचारी आणि चतुर होता, म्हणून एकाए-
कीं एकादी गोष्ट करीत नसे. त्याची अ-
शी मसलत होती कीं हळूहळू लोकांत नवे
प्रचार पाडून शेवटीं आपलें इछित संपादा-
वें. देवभजनाचे रीतीचा निश्चय करायाक-
रितां एक मंडळी नेमिली; तिणें तें काम वि-
चारानें यथास्थित केलें.पुढें एक राज्यनियम
केला, तो असा कीं धर्मपक्ष्यांनीं लग्न केल्या-
स चिंता नाहीं; त्या नियमानें आपले पात-
कांचा उच्चार करायाचा संस्कार केवळ मो-
डिला नाहीं, परंतु लोकांचे मर्जीवर ठेविला.
असे आपले गुरूचे जुलुमापासून मुक्तझा-
ल्यामुळें लोकांस असंतोष झाला नाहीं;
आणि द्रव्यांतरमत लोकांनीं स्वेछेनेच सो-
डून दिलें. शेवटीं क्रिस्तियनाचे धर्म-
शास्त्राशीं विरुद्ध जीं क्याथोलिक ध-
र्मांत मतें आणि आचरणें चालिलीं हो-
तीं त्यांचा लोकांनीं त्याग केला; आणिं

अंतां

आतां असा धर्म इंग्रेजांत चालिला आहे, तसा बहुधा सर्व इंग्लंडांत चालूं लागला. या सर्व नवे गोष्टींवर लोक आणि बहुतक-रून सर्व धर्मपक्षी यांची संमति पडली; ग्यार्डिनर आणि बार्नर या नावाचे दो-घे पुरुष मात्र त्यास केवळ प्रतिकूळ होते; ह्मणून त्यांस किल्ल्यावर पाठविलें; आणि भिवविलें. कीं आज्ञे प्रमाणें वर्तलेत नाहीं, तर तुह्मावर सरकारची गैरमर्जी होईल.

अशा कर्मांनीं त्या संरक्षकाची लोकां-त फार कीर्ति झाली; परंतु त्या प्रमाणेंच त्यास शत्रूही बहुत होते. टर्ली ह्मणून वार्विकाचा अर्ल मंत्री होता, तो फार का-वेबाज, लोभी, आणि दुर्गुणी असे. कसें तरी करून राजाजवळचे प्रथमस्थानीं आपली स्थापना करून घ्यावी असा त्याचा निश्च-य होता; तो सिद्धीस न्यायास उपाय कोणते करावे, हा त्याणें कांहींच विचार केला नाहीं;

आणि

आणि बाहेरून चांगलेपणा दाखवून अनेक दुष्कर्मे केलीं. सौथंपनाचे अर्लाशीं सख्य करून त्याणें आपला एक पक्ष जमविला; यांतील लोकांनीं अशी दृढ प्रतिज्ञा केली, कीं आपल्यावर संरक्षक अंमल करितो, हा याचा नाहींसा करावा. गोष्ट अशी झाली कीं राज्यामध्यें जो पक्ष मोठा जबरदस्त होऊं लागला होता, त्याशीं त्या संरक्षकाचें वांकडें पडलें. तो डौल आणि सत्ताही फार करी, म्हणून मंत्रिमंडळीचा त्यावर रोष होता. नूतन धर्मावर त्याची भक्ति होती म्हणून क्याथोलिक त्याशीं वांकडे होते,- त्याणें आपले भावास दुःख दिलें म्हणून बहुत लोक त्याचा तिरस्कार करीत; दुसरें, त्याणें राज्य आणि धर्म संस्थाने हीं बुडवून आपण बहुत संपत्ति मिळविली होती म्हणून सर्व त्यास वाईट म्हणत असत. त्या वेळेस तो नाना प्रकारचीं अयोग्य कर्मे करूं-

न

न स्त्रांड रस्त्यांत एक मोठा शोभायमान वाडा बांधीत होता, हेंही एक कारण लोकांस त्याची निंदा करायास झालें. वाडा बांधायास जमीन आणि सामान पाहिजे ह्मणून त्याणें सेंतमेरीचें एक देऊळ आणि धर्माध्यक्षांचीं तीन घरें मोडिलीं होतीं.

पुढें थोडे दिवसांनीं त्यावर मुख्यत्वें असा आरोप ठेविला कीं, सर्व सत्ता त्याणें आपले हातीं ठेवून राज्यापहार करावा अशी त्याची मसलत होती. दुसरे कितिएक अपराध त्यावर लागू केले, परंतु ते सर्व मिळोन तो सरकार गुन्हेगार ठरला नाहीं असें ह्मणतात. असो; कसातरी त्यास किल्यावर टाकिला; पुढें त्यावर लार्डांचे सभेंत गुन्हेगारीचें पत्र केलें, परंतु सामर्सेटानें तें चुकविलें; कारण पूर्वीं तो गुडघे टेंकून मंत्र्याजवळ आपले सर्व अपराध कबूल झाला होता. ह्मणून इतकें मात्र केलें

लें कीं, त्या कडचा सर्व अंमल काढिला, आ-णि त्याची स्थावर जंगम सर्व संपत्ति जप्त करून सरकारांत नेली. परंतु पुढें राजानें ती त्याची त्यास परत दिली, आणि साम-र्सेट पुनः संकटांतून मुक्त झाला. असें हो-ईल हें कोणाचा मनांत ही नव्हतें. त्यास पुनः मंत्र्याचें स्थळ प्राप्त झालें, आणि जर त्याचे मुक्ततेबरोबर लोभाचें येणें झालें न-सतें, तर तो दैववान् खरा. तो केव्हां केव्हां राजा व सरकार यांचा धिक्कार करीत असे; तें वार्विकाचे अर्लाचे कानास लागलेंच जाई. तो अर्ल पुढें नर्थंबर्लेंडाचा ड्युक झाला होता. त्या ड्युकाजवळ साम-र्सेटाजवळचे लोक असत, ते आपणजा मसलती सांगत त्या येऊन त्यास कळवी-त त्यामुळें तो रागें भरून आपला नाश करितो, हें सामर्सेटास कळलें. नर्थंब-र्लेंडाचे आज्ञेनें त्यास आणि त्याचे साथी

दुसरे

दुसरे कितिएक होते त्यांस धरिलें; आणि त्याचे बायकोसुद्धां त्यास बंदींत ठेविला. पुढें त्यावर आळ घेतला कीं उत्तर प्रदेशांत बंड करायाचा त्याचा बेत होता; त्यामुळे रखवालीचे शिपायांची एक टोळी हजीरीचे दिवशीं मारिली; आणि लंडनांत दंगा करून किल्ला आपले स्वाधीन करून घ्यायाचा त्याचा बेत होता. हा आळ त्याणें आपल्यावरचा घालविला; परंतु इतकें कबूल झाला कीं, लार्डपाजेट मेजवानी करणार होता, तेथें नर्थंप्टन, नर्थंबर्लंड, आणि पेंब्रोक यांस मारायाची माझी मसलत होती खरी. पुढें नर्थंबर्लंड, नर्थंप्टन, पेंब्रोक आणि दुसरे मिळोन सत्तावीस सभासद एकत्र जमले; त्यांत मुख्य विंचेस्तराचा मार्कुइस बसोन, ते वेळीं त्यास गुन्हेगार ठरविलें. त्याचे शत्रु आणि चौकसदार दोनही तेच गृहस्थ.

त्यास

त्यास मारायास नेलें तेथें बहुत लोक पहावयास मिळाले होते; परंतु त्याचें चित्त किमपि व्यग्र झालें नाहीं. लोकांची त्यावर प्रीति होती. तो त्यांस मोठ्या धैर्यानें ह्मणाला कीं, राजा आणि सत्यधर्म यांचें प्रतिपालन करायाविषयीं मी यथाशक्ति प्रयत्न केला. लोकांनी तें सत्य ह्मटलें, आणि बोलिले "वास्तवीक केला खरा." त्या वेळेस लोकांत गडबड होऊं लागली; परंतु सामर्सेटानें त्यांस सांगीतलें कीं, तुह्मी स्वस्थ रहा; माझे अंतकाळाचा विचारांत आक्षेप आणूं नका; आणि माझे बरोबर ईश्वराचें भजन करा. असें ह्मणून त्याणें डोकें खालीं करून शिरछेद करून घेतला.

नर्थंबर्लेंड बहुत दिवस प्रथम स्थान मिळायाची आशा करीत होता; तशांत राजास दुखणें लागलें असें पाहून

त्यास

त्यास अतिशय लोभ उत्पन्न झाला. त्याणें त्या राजपुत्रास समजाविलें कीं, हेनरीनें आपले मृत्युपत्रांत असें लिहिलें आहे कीं, राज्याचा सरळ अधिकारी कोणी नाहींसा झाला असतां तुमचा बहिणी, मेरी आणि इलिझाबेथ आहेत त्याणीं राज्य करावें; परंतु पार्लमेंटानें असें ठरविलें कीं त्या दोघीही अस्सल नव्हत; तुमची आत स्काट्लंडाची राणी आहे खरी; परंतु तिचें नाव मृत्युपत्रांत नाहीं, आणि ती परकुळींची ह्मणून तिला अधिकारही नाहीं; या रीतीनें त्या राजकुमारींस राज्याधिकार नाहीं; तर आतां राज्य डार्सेटाची मार्शनेस लेडी जेनग्रे आहे तीस प्राप्त व्हावें.

त्याणें राजास समजाविलें कीं ती राज्य करायास परम योग्य; शरीरानें सुंदर, विद्वान्, आणि गुणीही तशीच. राजपुत्र,

अमात्यांची मसलत सर्वदा मान्य करीत असे, ह्मणून त्याणें त्या गोष्टीचा विचार मंत्र्यांवर टाकिला; त्यांजवळ आपले इछे प्रमाणें करून घ्यायाजोगी त्याची भीड होती, ह्मणोन ती गोष्ट सिद्धीस गेली.

पुढें राजाचें शरीर अशक्त होत चालिलें, तशांत नर्थंबर्लंडानें लेडी जेन ग्रेचा बाप डार्सेटाचा मार्कुइस होता त्याचें हित साधिलें- तें असें की, पूर्वीं कांहीं दिवस नार्फोकाचे ड्युकाची पदवी नाहींशीं झाली होती ती त्यास दिली. असा त्या गृहस्थावर उपकार करून आपला चवथा मुलगा लार्ड गिल्फर्ड डड्ली होता त्याशीं आणि लेडी जेनेशीं लग्न केलें, जीचें हित साधाया करितां त्याणें इतका प्रयत्न केला होता. आणि आपली मुलगी लार्ड हेस्तिंसाला दिली. हीं दोन लग्नें मोठ्या समारंभानें केलीं. पुढें

ढें एडुर्ड राजा दिवसानुदिवस क्षीण हो-
त चालिला; शरीरीं मृत्यूचीं चिन्हें दि-
सूं लागलीं; कितिएक असें बोलूं लाग-
ले कीं, डड्ली त्याचे जवळ आल्यापासून
तो अधिक अशक्त झाला. नर्थंबर्लंडा-
चें आचरण पाहून असे तर्क लोकांचे म-
नांत उत्पन्न झाले असतील; आणि त्या-
णे राजाजवळचे जुने लोक सर्व काढून
आपले तेथें लाविले हें पाहून ते तर्क अ-
धिक वाढले असतील. असे लोकांचे सं-
शय पाहून नर्थंबर्लंडास कांहीं वाईट
वाटत नसे; तो उत्तरोत्तर राजाचे सेवेंत
विशेष दक्षता दर्शवी, आणि तो कसात-
री बरा व्हावा अशी बाहेरून चिंता करी;
परंतु आंतून असें इछित होता कीं कसें
तरी होऊ, आणि माझे सुनेस एकवेळ
राज्य मिळो. एक अज्ञान बायको राजपु-
त्रास औषध देत असे, तिचा औषधापा-

सूनें

सून त्याचें दुखणें अधिक झालें; त्याचा-
नें बोलवेना, श्वास बंद झाला, नाडी मेली,
पायांस सूज आली, तोंडावर फिक्केपणा
दिसूं लागला, आणि सर्व मृत्यूचीं चिन्हें
होऊं लागलीं. मग तो सोळावे वर्षी ग्री-
निज शहरांत मरण पावला. त्याणें सा-
त वर्षें राज्य केलें. त्याचे मरणें करून स-
र्वांस दुःख झालें; कारण त्याणें लहान व-
यांतच बहुत शहाणपण दाखविलें.
त्या मुळें तो लोकांचें उत्तम रीतीनें परि-
पालन करील अशी सर्वांची आशा हो-
ती. त्याणें इतकें लहान वय असतां ब-
हुत विद्यांचा अभ्यास केला होता अशी
कथा सांगतात.

सन १५ जुलै त ६

---

# प्रकरण २५.

## मेरी राणीची कथा

### सन १५५३ पासून १५५८ पर्यंत.



राजा एड्वर्ड मरण पावल्या नंतर राज्याधिकाराविषयीं दोघी बायकांचा तंटा लागला त्यांचीं नावें एक मेरी, जी हेनरी राजास क्याथेरीन राणी पासून झालेली कन्या; तीस राज्याधिकार प्राप्त होण्याविषयीं केवळ आपले पक्षाचे वास्तवीकपणाचा मात्र आधार होता. दुसरी लेडी जेनग्रे. तिचें एड्वर्ड राजाचे मृत्युपत्रांत नाव होतें; आणि तिचा सासरा नर्थंबर्लंडाचा ड्युक त्याचेंही तिला पाठबळ होतें. मेरीची पोपाचे दों-

गमतावर फारभक्ति असे; आणि तिचा असा समज होता कीं आपलाप्राणहीद्यावा, परंतुपुरातन धर्म मिथ्या मानूं नये. ती सर्वदा परतंत्रतेमें वर्तत असे, म्हणून तिच्या स्वभाव एकल कोंडा होता. बाप जीवंत असतांही ती आपलें मत संरक्षून त्याचा नवे धर्मास अनुसरली नाहीं. असा धर्माविषयीं अतिशय पक्षपात होता यामुळें तिला लोक आग्रही मानीत असत. इकडे लेडी जेनग्रेची धर्मांतर संस्थापकांवर बहुत प्रीति होती; त्यावेळेस तिचें वय सारें सोळा वर्षांचेंच होतें खरें; परंतु तिचा बुद्धींत जितकी प्रौढता होती, तितकी असणारीं अशीं मनुष्यें बहुत आढळत नाहींत. सर्व ग्रंथकारांचे लेख या गोष्टीविषयीं एक मिळतात, कीं तिची बुद्धि स्वभावतः तीव्र होती; आणि तशांत व्यासंगें करून ती बहूतंच सूक्ष्म

झाली

झाली होती; इत्यादि तिचे गुण पाहून सर्व लोक विस्मय करीत असत.

राजर आस्काम म्हणून तिचा गुरु होता, तो एके दिवशीं तिला भेटायास गेला; आणि घरांत पाहूं लागला तों सर्व मनुष्यें पारधी करायास गेलीं आहेत, आणि ती मात्र एक ग्रीक भाषेचा ग्रंथ वाचीत बसली आहे. त्याणें तिला पुसलें कीं सगळीं पारधीस गेलीं आणि तुह्मी कां नाहीं गेलींत? तिणें उत्तर केलें. कीं त्यांला तशांपासून सुखाचे कण प्राप्त होतात; मला तर विद्येपासून सुखाचे ओघ मिळतात.

तिचे स्वार्थाविषयीं लोकांचे प्रयत्न चालिले आहेत हें वर्तमान तिला पूर्वी कांहींच ठाऊक नव्हतें, आणि तें कळलें तेव्हां ती चकीत झाली. तिला दुःख झालें; नेत्रांपासून अश्रुपात येऊं लागले; तिचें समा-

धानें

धान होईना; शेवटीं मोठ्या संकटानें आपला सासा आणि बाप यांचे प्रार्थनेस ती अनुसरली. सर्व राज्यांत तिची दंवडी पिटाण्याचा हुकुम केला, परंतु तो थंडपणानें फर्माविला गेला.

राजा मेला अशी बातमी समजल्यावर मेरी नार्फोक प्रांतांत केनिंग्हाल या नावाचे वाड्यांत रहावयास गेली होती, तिणें राज्यांतील सर्व प्रमुखांस व अमात्यांस पत्रें पाठविलीं; त्यांतील सारांश हा कीं, आपण राज्याची वास्तवीक अधिकारी, हें तुमचे ध्यानांत असावें; आणि तुम्ही उशीर न लावितां माझी दंवडी पिटावी. मग लवकरच ती अजिंक्य झाली; आणि तिचे जवळ चाळीस हजार फौज जमली. इकडे नर्थंबर्लंडाजवळ जे कांहीं थोडेसे लोक होते त्यांचाही निश्चय दृढ नाहीं, असें पाहून तो युद्धाची

तयारी

तयारी करायास मनांत भिऊं लागला.

**लेडी जेनेनें** दहा दिवस राज्य करून पुढें भयंकर समय आला पाहुन संतोषानें तें सोडून दिलें; आणि आईस बरोबर घेऊन आपण पूर्वींचे ठिकाणीं जाऊन राहिली. **नर्थंबलेंडानेंही** पाहिलें कीं आपले सर्व उद्योग निष्फल झाले; असें समजून तो राज्यांतून निघोन जायाचे बेतांत होता; परंतु शिपायांची एक टोळी येऊन त्यास अडविला, आणि सांगीतलें कीं तूं चाललास कोठे ? तूं आमचा वास्तवीक धान्यावर आमचा करवीं शस्त्र धरविलेंस याचा जापसाल तुजपासून आम्ही अगोदर करून घेऊं. या रीतीनें चहुंकडून निरुपाय होऊन तो शेवटीं **मेरीस** शरण गेला; पुढें थोडे दिवसानीं त्याचा शिरच्छेद झाला. **लेडी जेनग्रे**, आणि **लार्ड गिल्फर्ड डड्ली** या दोघांसही तेंच शासन ठरविलें, परंतु तें

त्यां

त्या वेळेस च करायाची मसलत नव्हती.

अशी गोष्ट झाल्यावर मेरी लंड-नांत आली, आणि बहुत रक्त नपडतां सुखानें राज्यासनावर बसली. हें लक्षण सुखाचें दिसलें, परंतु हें पुढें लवकरच अस्तास जायाचें आहे. ती राणी एकलकोंडी आणि प्राचीन धर्माची अतिशय भक्त होती असें पूर्वी सांगीतलें, म्हणून तिणें धर्माध्यक्षांस पूर्वी सारिखी सत्ता द्यायाचा निश्चय केला. अशानें इतकें मात्र झालें असतें कीं, जा त्रासांतून राज्य नुकतेंच सुटलें होतें त्यांत पुनः पडतें. पूर्वींचे राज्यांत ग्यार्डिनर, तान्स्तल, डे, हीथ आणि बोंझी यांस क्याथोलिक मताचे अभिमाना करितां बंदींत ठेविले होते; त्यांस मुक्त करून आपले स्थळीं नेमिले. आणि त्यांचे हुकूम चालू केले.

पुढें राणीनें पार्लमेंटाची सभा के-

लीः

ली; तेव्हां पूर्वीं राज्यांत धर्मसंबंधीं जे निय-
म झाले होते ते सर्व फिरले; ह्मणून हेन-
री मेला त्या वेळेस अशी धर्माची पद्धती
चालली होती तशी पुनः पडली.

यारीतीनें धर्म पूर्वींचे अयोग्य दशे-
स पावत असतां, राणीचे मंत्री संधी प-
हात होते कीं तिचें एके क्याथोलिक
नवऱ्याशीं लग्न करून देऊन तिची स-
त्ता वाढवावी; मग त्याणीं प्रसिद्ध जो, पांच-
वा चार्लिस, स्पेन देशाचा राजा त्याचा मु-
लगा फिलिप, तो ठरविला. लोकांनी मा-
गून कुरकुर करूं नये या करितां लग्नाचा
करार इंग्लंडाची प्रतिष्ठा राखून आप-
ल्या पक्षास अनुकूळ असा केला; त्यामुळें
ते किंचित् शांत झाले. परंतु त्याणीं हळू
हळू करून शेवटीं एक मोठें बंड बनीवलें;
त्यांत सरटामस. वयाट ह्मणोन हो-
ता त्यास मुख्य केला होता. पुढें राणीनें

त्यास

त्यास पकडून त्याचे कितिएक सोबत्यां-
सहवर्तमान शिरछेद केला.

लोकांचे मनांत विशेष करुणा या
वयाचें कारण असें झालें कीं, लेडी जे-
न ग्रे आणि तिचा नवरा लार्ड गिल्फ-
र्ड डड्ली यांचा शिरछेद केला. त्यांचा त्या
बंडांत कांहीं संबंध नसतां, उगीच शासन
मात्र झालें. तें असें. वयटाचें शासन
झाल्यावर पुढें दोन दिवशीं लेडी जेन आ-
णि लार्ड गिल्फर्ड या दोघांस सांगीतलें
कीं, तुह्मी मृत्यूची तयारी करावी. हा नि-
रोप ऐकून लेडी जेन कांहीं न घाबरतां
स्थिर निश्चय करून राहिली. आपले
मृत्यूस तीन दिवसांचा अवकाश आहे
असें समजून तिला वाईट वाटलें. ति-
चा शिरछेद व्हायाचा आदीं तिचा नव-
ऱ्यानें सांगून पाठविलें कीं, मी तुझे भेटी-
स येतों; परंतु तिणें नको ह्मटलें; कारण

तिला

तिला असें वाटलें कीं, हा शेवटचा वियो-
ग उभयतांस परम दुःखकारक होईल. पू-
र्वी त्यांचा किल्ल्याचे बाहेर शिरछेद करा-
या असें ठरविलें होतें; परंतु त्यांचा निर-
पराधीपणा आणि सौंदर्य पाहून, लोक
एकादा अनर्थ करितील, असें अमजून
किल्ल्यांतच त्यांचा शिरछेद करावा असा
हुकूम केला.

लार्ड डड्लीचा दैवीं प्रथम मरायाचें
आलें; आणि लेडी जेन आपले शिरछेद
स्थळीं जात होती, तिला वाटेनें नवऱ्याचे र-
क्तानें भरलेलें धड किल्ल्याचे देवळांत पुरा-
या करितां येऊन चालले होते, ते लोक भे-
टले. ती कांहीं वेळपर्यंत विकार रहित
मनानें प्रेताकडे पहात उभी राहिली; आ-
णि शेवटीं सुसकारा टाकून त्यांस बोलली
कीं, चला पुढें. शिरछेद करायाचे पूर्वी ती
म्हणाली कीं, मी राज्य स्वीकारिलें हा मा-

झा

ह्मा अन्याय नव्हे; तर मी विशेष आग्रह धरून त्याचा त्याग केला नाहीं हा माझा अपराध. लोभामुळें माझे हातून चूक झाली नाहीं, तर वडिलांचा बहुत मान राखिला ह्मणून. यारीतीनें राज्याचा जो नाश झाला त्यास प्रायश्चित्त मृत्यु; ह्मणूनमी तो मोठ्या उत्साहानें भोगितें. ह्या माझे दाखल्यावरून लोकांनीं समजावें कीं, जा कर्मैं करून सर्व लोकांचा अस्वार्थ होतो, तीं कर्मैं बुध्याजरी न घडलीं तरी त्याचें शासन होणार नाहीं असें समजूं नये. या अर्थाचें भाषण करून तिणें दासीकरवीं आपले आंगावरचा पोषाग काढविला, आणि शिरच्छेद करणाराचे स्वाधीन झाली.

अशीं दुष्ट कर्मैं सिद्धीसनेणारामध्यें मुख्य विंचेस्तराचा बिशप ग्यार्डिनर आणि क्यार्डिनल पोल हे दोघे हो-

ते

ते. पोल कांहीं निमित्तानें इटली देशास गेला होता, तो नुकताच परत आला होता. त्याचें आणि राजाचे कुटुंबाचें जवळचें नातें होतें; त्यास क्याथोलिक धर्माचा पक्ष असे; हेनरी राजाचें मत त्यास संमत नव्हतें; आणि त्याणें हेनरीस लागे, असें कांहीं लिहिलें होतें; ह्मणून त्याची त्यावर गैरमर्जी होती. इतका त्याचा धर्मा विषयीं दृढ प्रेमा; ह्मणूनच, पोपानें त्यास आश्रय देऊन आपले संस्थानाचा वकील करून इंग्लंडांत पाठविला. ग्यार्डिनराचा स्वभाव वेगळे तऱ्हेचा होता; त्याचें लक्ष्य इतकेंच कीं, कसा तरी राजास प्रसन्न करावा. या रीतीचा त्याचा धूर्तपणा बहुत वेळ स्पष्ट दिसून आला. मग अनर्थाचा उद्भव झाला; आणि प्रथम ग्लौसेस्तराचा बिशप हूपर आणि सेंटपालाचा

मि

प्रिबेंडरी[1] राजर्स याचा प्रथम वध केला. राणीनें न्यायाधीश नेमिले; त्यांत चान्सेलर[2] मुख्य त्वें बसवून त्यांची चौकशी केली.

पुढें तें शासन भोगायाचें सांडर्स आणि टेलर या नावाचे दोघे धर्माध्यक्ष होते, त्यांचे दैवीं आलें; कारण त्याणीं धर्मांतराची संस्थापना व्हायाविषयीं फार प्रयत्न केला होता. लंडनाचा बिशप बानर होता तो त्या पराक्रमावरून फार चढून गेला, आणि त्या बिचाऱ्यांचा जीव गेला, म्हणून त्यास हर्ष झाला; तशांत राणीनेंही त्यास पत्र लिहिलें कीं हें धर्माचें कर्म असेंच निर्दयपणानें करीत जावें. पुढें

---

१ धर्मसंबंधी एक पदाचा अधिकारी आहे त्याचें नाव.

२ ही एक राजाचे गृहसंबंधि अमात्यांतली पदवी आहे.

थोडे

थोडे दिवशीं लंडनाचा बिशप रिड्ली होता त्याचा आणि वोर्सेस्तराचा बहुमान्य बिशप लातिमर या दोघांचा राणीचे हुकुमावरून शिरछेद केला. धर्मांतराची संस्था क्षायाविषयीं रिड्लीनें मुख्यत्वें करून बहुत श्रम केला होता; त्याची भक्ति, विद्वत्ता, आणि बुद्धि कौशल्य हीं पाहून त्याचे स्नेही विस्मय पावत, आणि शत्रुही भीत असत. मरायाचे पूर्वरात्री त्याणें आक्सफर्डाचा मेयर आणि आपली बायको यांस भेटायास बोलाविलीं. त्यांचा डोळ्यांतून अश्रुपात येताहेत असें पाहूनही त्याचा मनांत कांहीं विकार उत्पन्न झाला नाहीं; तशा दुःखसमयांत त्यास आंतून आश्रय होता. जेव्हां त्यास काठीवर जाळायास नेला, तेव्हां त्याचा जुना स्नेही लातिमरही त्याचे दृष्टीस पडला.

त्याकाळीं जितके धर्माध्यक्ष होते, त्यांत लातिमराची मात्र एकभक्ति निष्कृत्रिम होती. दरबारी रीतीचें बोलणें त्यास ठाऊक नव्हतें; तो जें काय बोलायाचें तें उघड बोलत असे; तशा बोलण्याच्या मोठे मोठे लोकही फार धाक मानीत. त्याचे धर्माविषयींचे वाद आजून पर्यंत आहेत; त्यांवरून असें वाटतें कीं तो पुरुष फार विद्वान् आणि चतुर होता. त्या वादांत सर्वत्र वास्तवीकपणा, असा व्यास आहे तसा दुसरे कशांत नाहीं. रिड्ली त्या आपले मित्राचें समाधान करूं लागला; तेव्हां तो ममतेनें बोलिला; "दादा, स्वस्थ असा; आज आपण जो इंग्लंडांत अग्निप्रदीप्त करूं, तो कधीं विझणार नाहीं, असा माझा निश्चय आहे." त्यांस जाळायाकरितां विस्तव पेटत होता, तितक्यांत एक क्याथोलिक धर्माध्यक्ष संतप्त होऊन

त्यांस

त्यांस, आणि जवळ होते लोक त्यांस, धर्माचा गोष्टी सांगूं लागला. तयारी चालली होती ती पाहून कांहीं मनांत न भितां, रिड्लीनें त्या गोष्टी शेवटपर्यंत चित्त देऊन ऐकिल्या; आणि त्या धर्माध्यक्षास सांगितलें कीं, जर मला कांहीं वेळ वांचविलें तर मी तुम्हीं बोलिलेत या सर्वांचीं उत्तरें सांगेन. परंतु त्यांस वांचविला नाहीं. शेवटीं ढीग केला होता त्यास आग घातली; त्या दोघांत लातिमर बिचारा लवकरच दुःखांतून सुटला; परंतु रिड्लीचे काळिजास अग्नि लागायाचे अगोदर फारवेळ पाय जळोन गेले, ह्मणून तो बहुत कष्ट पावला.

पुढें लवकरच आर्च् बिशप क्रामराची हीच दशा झाली; त्या मुळें सर्व लोकांस बहुत संताप झाला. पूर्वीं त्याणें देहावर फार प्रीति दाखविली होती;

ती

ती अशी. तो कोणे एके वेळेस बेसावध असतां त्याचे शत्रूंनीं नवा धर्म खोटा असा एक कागद करून त्यावर जबरीनें त्याची सही घेतली. तसा त्यास पुरता पातकांत पाडून मग त्याचे नाशाविषयीं उद्योग आरंभिला. जाळायाचे जागेवर त्यास नेला, आणि सभोंवता विस्तव पेटविला; तेव्हां त्याणें आपला उजवा हात जळेपर्यंत विस्तवांत धरिला; तो जळत असतां कांहीं दुःख किंवा शोक यांचा विकार न दाखवितां तो ह्मणत असे; "बोच लबाड हात." विस्तव जेव्हां शरीरास लागला तेव्हांही त्याणें कांहीं कष्ट दाखविले नाहीं. त्याचें मन अन्यजन्मींच्या सुखांकडे लागलें होतें. त्याचें शरीर जळलें तरी काळीज तशाचें तसेंच होतें. त्याणें दुःखें कसा धीर करून सोसलीं असतील, हें यावरून समजावें.

त्यां

त्या समस्तवधांत दोनशें सत्तर लोकांस जाळून मारिले; कैद केले, दंड घेतला, आणि घरदार जप्त केलें हे सर्व वेगळे जाळून मारिले त्यांत पांच धर्माध्यक्ष, एकवीस धर्मपक्षपाती, आठ दुसरे गृहस्थ, चवऱ्यायशी व्यापारी, शंभर शेतकरी, पंचावन्न बायका, आणि चार पोरें इतकीं एकंदर मेलीं. हें सर्व कर्म भयानक होय; आणि तेव्हां राज्याचीही दशा या रीतीचीच झाली होती.

ती अशी. फ्रान्स देशांत क्यालेइस म्हणून एक शहर सुमारें दोनशें वर्षें पर्यंत इंग्लिशांजवळ होतें; त्यावर येऊन फ्रेंचांनीं हल्ला केला, आणि अकस्मात् वेढून त्यांशीं बोलणें लाविलें. जें शहर तृतीय एड्वर्डाचे राज्यापासून इंग्लिशांजवळ होतें, आणि जास वेढा घालायास अकरा महिने लागले, तें शेवटीं गेसीचे

चे ड्युकानें आठ दिवसांत घेतलें. ह्याना-
श झाला तेणेंकरून सारे लोक कुरकुरूं ला-
गले, आणि राणीसही वाईट वाटलें; ती
असें बोलतानां कोणी ऐकिलें कीं, मी मे-
ल्यें तरी माझे हृदयावर क्यालेइस श-
हराचें नाव तशाचें तसेंच राहील.

या प्रकारचीं वारंवार दुःखें, लोकां-
ची कुरकुर, पाखंडाची वृद्धि, अयोग्य न-
वरा, आणि निष्फळ लढाई अशा गोष्टी
मनांत येऊन मेरीची शरीर प्रकृति अ-
शक्त झाली. तिचा मृत्यु जवळ आला
असें दिसूं लागलें; ह्मणून तिचें मन ध-
र्माकडे विशेष लागलें; या करितां लोक
पुढें राज्य कोणी करावें या मसलतीस
लागले; आणि पूर्वींपेक्षां इलिझाबेथ
राणीची अधिक आशा करिते झाले.

पुढें उत्तरोत्तर मेरी फार अशक्त
होत चालली; तिला जलोदर झालें होतें,

परंतु

परंतु तें गरवारपण असें वाटून तिणें त्या प्रमाणें पथ्य केलें; तेणें करून तो रोग वाढला. प्रजा आपला तिरस्कार करितात, आणि आपणास अप्रिय जी इलिझाबेथ ती पुढें राज्य करणार, हें समजून तिला जीर्णज्वर झाला; त्याणेंच ती मेली. त्या हतभाग्य राणीनें पांच वर्षें, चार महिने अकरा दिवस राज्य केलें. त्या वेळेस तिचें वय त्रेचाळीस वर्षांचें होतें.

---

# प्रकरण २६

## इलिझाबेथ राणीची कथा

### सन १५५८ पासून १६०२ पर्यंत



मेरी मेल्यानंतर कांहीं विघ्न न हो-
तां इलिझाबेथ राणी सिंहासनारूढ झा-
ली. त्या वेळेस लोक बहुत हर्षयुक्त झाले.
ही राणी पूर्वी कैदेंत होती. तेव्हांपासून-
च तिचा मनांत धर्मांतराची प्रवृत्ति व्हावी
ही गोष्ट होतीच; तशांत राज्य प्राप्त झा-
लें; मग ती त्याच उद्योगांत लागली. ति-
णें उद्योग आरंभिला, आणि पार्लमेंटा-
नें लागलाच सिद्धीस नेला. धर्मांतर व्य-
वस्थेस पुष्टिकारक असे हुकुमावर हुकु-
म होत चालिले; आणि इंग्रेज लोक सां-
प्रत

मत जो धर्मानें वागतात तो एकेच सेशा-
नांत दृढ झाला.

इतक्यानें सर्वत्र स्वस्थता झाली अ-
सेल, असें समजूं नये; कारण पुढें मेरी
ह्मणून स्काट्लंडाची राणी होती तिणें
इलिझाबेथ राणीचे मनांत भय आणि
क्रोध हे उत्पन्न केले. तें वर्तमान असें.
सप्तम हेनरी राजाची मार्गारेट ह्मणून
मुलगी होती ती त्याणें स्काट्लंडाचा
राजा जेम्स, त्यास दिली. त्या जेम्सा-
ची मेरी या नावाची मुलगी होती; तीश-
रीरानें फार सुंदर, आणि बुद्धिवान् असे.
ती लहान असतां तिचें आणि फ्रान्स
देशींचा राजपुत्र फ्रान्सिस होता, त्या-
शीं लग्न झालें. ती एकुणीस वर्षांची झा-
ली त्या काळीं तिचा नवरा वारला. पुढें
आपल्यास राज्य मिळावें ह्मणून तिणें
उद्योग आरंभिला; परंतु तिची विधवा

सासू होती तिचें प्राबल्य पाहून मेरी रा-
णी स्काट्लंड देशास निघून गेली. तेथें
तिणें असें पाहिलें कीं, लोकांचीं मनें धर्मां-
तराकडे लागलीं आहेत. तिचा विश्वास
प्राचीन धर्मावर होता. राजा आणि प्रजा
या दोघांचे धर्म भिन्न भिन्न असले तर त्या-
चा परिणाम कधीं चांगला व्हायाचा ना-
हीं. नूतन धर्मास अनुसृत जे धर्मपक्षी ते
लोक उपदेश करितात हें राणीला चांगलें वा-
टेना; तशाच राणीच्या ख्याल्या खुशाल्या
त्यांस आवडेनात; असें त्या दोघांचें वांकडें
उत्तरोत्तर अधिक होत चाललें. मग राणी-
चे हातून कांहीं तरी निमित्त घडावें आणि
आपण उघड तंटा करावा, ही धर्मपक्षी वा-
ट पाहूं लागले; तसें निमित्त तिचेकडून घ-
डायास उशीर लागला नाहीं.

तें असें. स्काट्लंडांत आल्यावर
मेरीनें दार्न्लीचे अर्लाशीं लग्न केलें.

तों

तो अर्ले भोळा, अज्ञानी, धीट, परंतु मनां-
चा चंचळ, दांडगा, जें सांगीतलें तें खरें वा-
टावें, अशा स्वभावाचा होता; आणि जव-
ळचे खुशामती लोक जें सांगत तें ऐकत
असे. ह्मणून ती त्याचा अपमान करूं ला-
गली. तें पाहून दार्न्ली कोपला; आणि
तिचा बोलण्या चालण्यांत अमक्यानें फे-
र पाडिला असेल असे जे जे दिसले त्यांचें
शासन करूं लागला. त्युरिन शहरांत ए
क गायक होता, त्याचा मुलगा त्याच विद्यें-
त निपुण डेविडरिझिओ, त्या वेळेस द-
रबारांत असे; त्यावर मेरीची फार कृपा
होती. कसा प्रसंग आला तरी ती त्याचे
मसलतीनें चाले; त्याचे मध्यस्थी वांचून
कोणाचें काज काम होत नसे; आणि जर
कोणाची कांहीं अर्जी असली, तर त्याणीं
नजरा देऊन किंवा खुशामत करून पूर्वी
त्यास आपला करून ठेवावा लागत असे.

दार्न्लीस

दांर्न्लीस कोणी सांगीतलें कीं, राणीच्या तुज़वरच्या काम रिझिओनें हरण केला. हें त्यास लागलेंच खरें वाटलें. आणि मग तो व त्याचे स्नेही कितिएक लार्ड त्याणीं मिळून मसलत ठरविली; ते सर्व मिळून तो रिझिओ राणीचे खोलींत होता तेथें गेले; त्यास तेथून ओढून काढिला; जवळचे खोलींत नेला, आणि मारिला. त्याचे शरीरावर छपन्नवार बसले. असें ते करीत असतां राणी फार शोकाकुल होऊन रडूं लागली. त्याची समाप्ति झाली असें समजल्यावर, मेरी डोळ्यांचीं आसवें पुसून बोलिली कीं, आतां मी फार रडत नाहीं, झालें याचा सूड उगवीन.

असा बेत करून तिणें सर्व दुःखशोक नाहींसा दाखवून आपल्या नवऱ्यास भ्रम पाडिला. तो इतका कीं तो विश्वासानें तिचे जवळ राहूं लागला. असें झाल्यां-

वर त्यास समजाविलें कीं, तुमची शरीरप्र-
कृति ठीक नाहीं, या करितां तुह्मी एडिंब-
र्ग शहरास गेलेत तर प्रकृतीस मानेल. हें
त्यास खरें वाटलें, आणि तो तिला बरोब-
र घेऊन तेथें गेला. प्रथम तीं दोघें एका
वाड्यांत होतीं; परंतु त्या घराची जमी-
न सखल; आणि मेरी जवळ येणार
जाणार लोकांची दाटी फार, तेणें करून
गडबड होईल ह्मणून तिणें त्यास दुसरे ए-
के वाँड्यांत स्वतंत्र जागा करून दिली.
तेथें मेरीनें त्याचा फार समाचार घेतला,
आणि प्रीति दाखविली. ती त्याशीं प्रीती-
नें भाषण करी, आणि तो होता त्याचे खो-
लींत एकादे वेळेस सारे रात्रभर निजे.
पुढें फेब्रुवारी महिन्याचे नववे तारि-
खेस तिणें आपले नवऱ्यास सांगीतलें
कीं, आज माझे वाड्यांत एके चाकराचें

* या वाड्याचें नाव हालिरुड होस.

लग्न व्हावयाचें आहे तेथें मला गेलें पाहिजे. असें ह्मणून ती गेल्यावर, अडीच प्रहर रात्रीस आ॑ घरांत राणीचा नवरा होता, तेथें मोठी गडबड झाली. ती पाहून गांवचे लोक घाबरले, आणि येऊन पहातात तंव त्या घरावर दारू घालून आग लाविली आहे; आणि डार्न्लीचें प्रेत जवळचे शेतांत पडलें आहे. त्या प्रेतावरून त्यांस कांहीं अपघातानें मारिला असें दिसत नव्हतें; परंतु सर्व लोकांचे मनांत संदेह आला कीं, त्यास कोणी तरी मारिला खरा; आणि ज्यावर मेरीची नुकतीच कृपा झाली होती असा बाथ्वेल ह्मणून जो गृहस्थ होता त्याणेंच हें काम केलें असावें, अशी बातमी उठली. प्रथम एक अपराध घडला ह्मणजे पुढें हातानें दुसरे व्हावयास उशीर लागत नाहीं. डार्न्लीस बाथ्वेलानें मारिला असें जरी लोक ह्मणत होते, आणि

त्याच्या

त्याचा फार तिरस्कार करीत होते, तरी त्यास दुसरें एक दुष्टकर्म करायास धीर झाला. तें असें. राणी आपले मुलास भेटायास स्तर्लिंग शहरास जात होती; तिला वाटेनें त्याणें आठशें घोडेस्वारानिशीं येऊन धरिली, आणि डन्बार शहरास नेली- तेथें त्याणें तिचेपासून जबरदस्तीनें आपलें काम करायाचें होतें तें करून घेतलें. त्या वेळेस लोकांचे मनांत आलें कीं, आतां बाथ्वेलाचा अपराध पुरा झाला; कारण जाणें राणीचा नवरा मारिला, आणि तिचेवर जुलुम केला त्यास क्षमा कशी होईल ? असें त्यांचे मनांत आलें होतें तशांत बाथ्वेलावर पहिले पेक्षें राणीची अधिक कृपा झाली, आणि त्याणें आपली बायको सोडून देऊन राणीशीं लग्न केलें; असें जेव्हां लोकांनीं पाहिलें तेव्हां ते फार विस्मय पावले -- या लग्नापासून

पासून मेरीची बहुत विपत्ति झाली. तिचीं दुराचरणें पाहून लोक तिचा अधिकारास अगदीं मोजिनात असे झाले. मग लोकांची एक जमात होऊन मेरीला धरून कैद करून ठेविली; सरोवरांत लाक्लिविन ह्मणोन किल्ला होता त्यावर नेऊन टाकिली; तेथें तिणें बहुत दुःख भोगिलें, आणि पश्चात्ताप पावली.

मोठ्यांस वाईट कर्मांमुळें जरी संकट प्राप्त झालें असलें, तरी लोकांस त्यांची दया येऊन ते त्यांस साहाय्य करितात. असें आहे ह्मणून जार्ज डौग्लास या नावाचा एक पुरुष होता त्याणें तिचीं वचनें आणि स्वरूप यांस भुलून, युक्तीनें तिला दुसरा वेष देऊन होडींत बसविली; आणि आपण वलवून कांठावर नेऊन ठेविली; ती बंदींतून मुक्त झाली ही बातमी समजतांच लोक तिचा पक्षास अ-

अनुसरले

नुसरले; आणि थोडे दिवसानीं तिचे जवळ सहा हजार सैन्य जमलें.

मग ग्लास्गो शहराजवळ लांग्सेड या नावाचे ठिकाणीं तिची आणि तिचे शत्रूंची लढाई झाली; तींत ती मेरी केवळ पराजित झाली. असा सर्व प्रकारें तिचा नाश झाल्यावर, इलिझाबेथ राणी आपलें संरक्षण करील, अशा आशेनें ती लढाई सोडून थोडेसे सेवक बरोबर घेऊन मोठ्या त्वरेनें इंग्लंडाजवळ चालिली. तें कांहींच नकरितां इलिझाबेथ राणीनें तिला कैदेंत ठेवायाचा हुकुम केला; परंतु तशांत ही ममतेनें तिचा साधेल तितका समाचार घेतला. त्या हुकुमाप्रमाणें तिला धरून स्ताफोर्ड प्रांतांत टद्बरी किल्ल्यावर ठेवून श्रूस्बेरीचे अर्लाचे स्वाधीन केली. तेथे तिला आशा वाटत होती कीं, राणीची माझेवर केव्हां तरी ख-

स॰ ६८

ष्ठित कपां होईल; आणि वास्तवीक शेवटीं त्या दोघींचें ऐक्य झालें असतें; परंतु मेरीच्या आग्रहीपणामुळें तें झालें नाहीं.-

त्या वेळेस मंत्री लोकांमध्यें मुख्यपदाचा अधिकारी नार्फोकाचा ड्युक होता; त्याचे गुण मोठे पदास योग्य असे होते. तो उदार, दयाळू, आणि सज्जन होता; म्हणून लोकांची त्यावर प्रीति असे; आणि तसाच त्याचा स्वभाव मध्यम होता, म्हणून प्रभूच्या मनांतही त्याविषयीं शंका येत नसे. त्याची बायको मेली होती; आणि त्याचें वय मेरीशीं लग्न करायास योग्य होतें; तीही सुंदर, आणि तिशीं लग्न झालें असतां त्यांत त्याचा स्वार्थ होता; अशा अनेक गोष्टीमुळें तो तिशीं आपलें लग्न व्हायाच्या उद्योग करूं लागला. त्या दोघांचें लग्न झालें असतां, आपल्यास वाईट, अशी शंका इलिझाबेथराः-

णीचे

णीचे मनांत येऊन, तिणें त्या ड्युकास ध-
रून किल्यावर ठेविला; तो कैदेंतून सुट-
ल्यावर राणी आणि नूतन धर्म यांचे जे वै-
री होते त्यांचीं आंतून संधानें चालू झालीं.
त्यांत रोमन दरबारचा वकील रोडाल्फी
आंतून होता; आणि मेरीचा वकील बि-
शपरास तोही होता. त्याणीं असें सं-
धान केलें कीं, नार्फोकानें मेरीशीं लग्न
करून तिला राज्याधिकारावर स्थापावी.
हा बेत नार्फोकाचे मनास आला; कामा-
मुळें किंवा लोभामुळें. तो सभ्य गृहस्थ प्र-
थम लोभामुळें त्यांचे बुधीस लागला; परं-
तु पुढें त्याचे हातून कितिएक अपराधही
घडले. ते राणीस कळतांच त्यांचा पुरा-
वा कराया करितां त्या ड्युकाचे चाकरां-
स शायदीस नेलें; त्याणीं सर्व वर्तमान उ-
घड केलें. असें पाहून रासाचे बिशा-
पानेंही ती सारी गोष्ट खरी म्हटली. स-
ग

ग ड्युकास लागलाच किल्यावर टाकून हुकुम केला कीं, तुझी चौकशी होणार आहे. त्यासाठीं तूं तयार असावेंस. मग पंचवीस सभासदांची जुरी होऊन त्याचा शिरच्छेद करावा असें ठरविलें; पुढें चार महिने झाल्यावर राणीनें मोठ्या संकटानें त्या शिरच्छेदाचे पत्रावर सही केली. तो ड्युक स्वस्थ चित्तें करून मरण पावला. त्याणें असा पुरावा केला कीं राणीचे सत्तेस अनिष्ट, असा मी कांहीं बेत करीत नव्हतों; परंतु तो कबूल झाला कीं मला शासन केलें हें योग्य.

लोक अशीं लचांडें करीत. त्या मुळें व्यर्थ मेरीस दुःख होई; कारण तिला जितकीं मोठीं संकटें प्राप्त झालीं, तितकीं शत्रूचा दुष्टपणामुळें झालीं नाहींत, तर स्वपक्षी लोकांचे उतावळी मुळें. इलिझाबेथ राणीचे मंत्री वाट पहात होते कीं, मेरीचे

शत्रुत्वाचें कांहीं चिन्ह दिसून यावें; तें वर्तमान असें झालें. जान बालार्ड ह्मणून एक पोपाचे मताचा पक्षपाती होता; तो रीम्स शहरांतले इंग्रेजी शाळेंत जन्मला होता; त्याणें प्रतिज्ञा केली कीं, राणी इलिझाबेथ आपले धर्माची वैरी ह्मणून कोणता तरी उपाय करून मी तिचा प्राण घेईन. असा अविचारी बेत करून तो शिपायाचें सोंग घेऊन इंग्लंडांत आला. त्याणें तेथें आपलें नाव कपतान फार्टेक्स, ह्मणून सांगीतलें; आणि असा बेत आरंभिला कीं, राणीस मारावी, राज्यांत दंगा करावा, आणि तेव्हांच बाहेरून येऊन शत्रूनीं चढाव करावा. डर्बी प्रांतांतले डेथिक गावांत रहाणारा धनवान, मोठ्या कुळांतला, असा आंथनी बाबिंग्तन या नावाचा एक गृहस्थ होता, त्याजवळ तो बालार्ड प्रथम गेला